# तृतीय खंड

--०--

## महोदरचरित्र

### सूर्य–बालखिल्यसंवाद–सूर्यसंजीवन–सूर्यवरप्रदान–कामचरित्र–स्कंदजन्म व तारकासुरवध–मोहासुरचरित्र–व गणेशकृत ज्ञानदान व मोहासुरशांति

सूत :– शौनकमुने ! दक्षाने मुद्गलास विनंति केली की, 'मला आणखी महोदराचे, गणपतीचे, चरित्र सांगा.' मुद्गलाने आनंदाने ही गोष्ट कबूल केली व सांगण्यास आरंभ केला. तो ह्मणालाः सूर्य रथांत बसून आपले पर्यटण करू लागला ह्मणजे वालखिल्य ऋषि त्याचे आराधन करतात. एकदा त्यांच्या दृष्टीस पडले की, सूर्य हा स्वतः गणेशाचे कीर्तन भक्तीने करतो. सूर्य स्वभावतः कर्माधार व ज्ञानरूप असतांही त्याला गणपतीचे आराधन का करावे लागते, हे ऋषीस समजेना. तेव्हां त्यांनी सूर्याला 'गणेशस्वरूपाचा वृत्तांत विचारला.' नतर सूर्याने गणेशब्रह्माचे स्वरूप सांगितले व गणेशमहात्म्य सांगण्याला आरंभ केला तो असाः 'एकदा कश्यप मुनीने माझी तपश्चर्या करून मला प्रसन्न करून घेतले' व 'तुझा पुत्र मी होईन व तुझ्या सर्व इच्छा सफल होतील.' असा मी त्यास आशीर्वाद दिला. त्याच्या पत्नीचीही तपश्चर्या तशीच होती ह्मणून तिलाही तसाच वर दिला, पुढे त्यांच्या घरी माझा

जन्म झाला, व विश्वकर्म्याच्या 'संज्ञा' नामक मुलीशी माझा विवाह झाला. ब्रह्मदेवाने मला ज्योतिर्गणांचा व ग्रहांचा नायक केले. हा माझा गौरव व माझी विस्तीर्ण सत्ता, तसेच माझे विलक्षण ऐश्वर्य इत्यादि पाहून मला गर्व झाला की 'माझ्या आधारावर हे विश्वचक्र चालते, मला मात्र कोणाचा आधार नको. पर्जन्यस्वामीही मीच. सारांश, मीच सर्वश्रेष्ठ आहे.' या गर्वाचे कारण, मला गणपतीचे विस्मरण झाले, हे होय. विघ्नेशाचे विस्मरण म्हणजे विघ्नांस आमंत्रणच! 'असो; पुढे, माली व सुमालिक या दैत्यांनी शंकराचे आराधन करून एक अति तेजस्वी विमान मिळविले व त्यांनी मला व माझ्या प्रकाशाला निरर्थक केले. मी निरुपयोगी झालो. तरी आमच्या तिघांच्या असह्य प्रकाशाने पृथ्वीवर हाहाकार झाला. शंकराने रागाने माझेच शिर तोडले! मी नाहीसा झालो, तेव्हां वेदकर्माचा लोप झाला. म्हणून शंकराने गणपतीचे स्तवन केले. गणपतीनेही प्रसन्न होऊन मला सजीव केले. तेव्हां 'मलाही जिवंत करणारा निराळा कोणी आहे.' असे मला समजले! त्याच्या शोधार्थ मी जाणार तो ब्रह्मदेवाने मला सर्वाधार श्रीगणेशस्वरुप व शांतियोग यांचा उपदेश केला. नंतर माझे गर्वहरण झाले. 'गणेश' नामक ब्रह्माचाही उपदेश मला ब्रह्मदेवाने केला. नंतर मीं मंत्रपुरःसर गणेशाराधन केले व गणपतींस प्रसन्न करून त्यापाशी अखंडस्मरण व अखंडभक्ति ही मागितली व मिळविली. म्हणून सर्वाधार जो गणपति त्याचे मी रोज आराधन करतो. समजले?'

**सूतः-** गणेशभक्तानों! नंतर सूर्याने वालखिल्यांस मोहासुराची कथा सांगितली, ती अशी: पूर्वी एकदा ब्रह्मदेवाने तारकासुर नावाच्या राक्षसाला अनेक विलक्षण वर दिले होते; कारण त्याची तपश्चर्याच

तशी कांही विलक्षण होती. ब्रह्मदेवाच्या वराने तारकासुर तिन्ही लोकांचा स्वामी झाला. त्याने देवास रानावनात घालवून दिले. पुढे नारदाने त्यांस सांगितले की, 'शिवपुत्राच्या हातून त्याचा मृत्यु आहे, ह्मणून शिवाचे आराधन कर व त्यास संतुष्ट कर.' त्यावेळी शिव तपश्चर्येसाठी वनात जाऊन राहिले होते. देवांस कळले ही स्वारी ध्यानस्थ! तेव्हां पार्वती अति मनोहर भिल्लीणीचा वेष घेऊन तेथे आली. तिने आपल्या स्वरूपाने त्या वनाला अत्यंत सौभाग्यश्री मिळवून दिली. शंकराने ध्यान आटपून डोळे उघडले तो हे सर्वांगसुंदर तरुणींचे अभिनव मनोहर स्वरुप विद्युत्तेजाने पुष्पवाटिकेत वावरत आहे, असे त्यास दिसले. तेव्हां शंकराचे ध्यान गडबडले व तो भिल्लिणीच्या मागे लागला. ती पुढें पळत आहे, मागून दिगंबर शंकर धावत आहे, याप्रमाणें कांही वेळ रंगण धरल्यावर ती अदृश्य झाली. पण शंकराचा कामोद्रेक असह्य होऊन त्याचे विर्य खाली पडले. त्यापासून एक चार हातांचा, उग्र स्वरुपाचा, जाड हाडापेरांचा, असा मोहनामक राक्षस उत्पन्न झाला. असो; खिन्न होऊन शकर स्वस्थानी गेला व विचार करता कामाचे हे सर्व चेष्टित आहे, असे जाणून क्रोधयुक्त होत्साता त्याने कामाला जाळून टाकिले. काम तेव्हांपासून अनंग झाला. पुढें शंकराच्या सांगण्यावरुन कामाने रतिसह नाशिकक्षेत्री गणपतीची आराधना केली. गणपति प्रसन्न झाले 'पण शिवाचे कृत्य मला नाहीसे करता येणार नाही' असे ह्मणून त्यांनी मदनाला सागितले की, 'यौवन, स्त्री, सुवासिक पुष्पे, मधुर गायन, कोकिलकूजित, वसंतऋतु, मंद व सुगंध वायु, मनोहर वस्त्रालंकार इत्यादि किंवा यांपैकी दोनतीन गोष्टी मिळाल्या की तुला देहप्राप्ति होईल

वं तूं शंकरादि सर्व देवांस, नारदादि महर्षीस व सर्व प्राणिमात्रांस मोह घालून वश करशील. तुला एकदा यादवकुलांत कृष्णाच्या उदरी प्रद्युम्न नावाने जन्म येऊन तूं सदेह होशील; हे खरे, पण पुढे तूं अनंगच राहशील.' हा वर प्राप्त करून घेऊनही स्वानंद-सुखार्थ कामाने तपश्चर्या केली व भक्तिने गणेश प्रसन्न होऊन त्यास अभीष्ट वर देते झाले. इकडे देवकार्यार्थ शंकरपार्वतीचा संयोग होऊन कार्तिकेयाचा जन्म विलक्षण प्रकाराने झाला. त्याला सहा तोंडे आहेत ह्मणून त्याला षडानन ह्मणतात. असो; ह्या षडाननाने गणेशभक्ति करून तारकासुराचा वध केला इकडे शंकर-वीर्यापासून मोहासुर झाला होता, तो राक्षस शुक्राचार्याकडे जाऊन आपला वृत्तांत सांगता झाला शुक्राला त्याची दया आली. त्याने त्याची मुंज, वेदाध्ययन, लग्न इत्यादि सर्व सस्कार केले. त्याच्या बायकोचे नाव मदिरा होते. असो; मोहासुराने ऊर्ध्वदृष्टि ठेऊन, सूर्यमंत्र जपून व निराहारी राहून एकनिष्ठेने सूर्यांचे आराधन केले. भक्तिला सूर्य प्रसन्न झाला. त्याने मागितले ते सर्व वर त्याला दिले. मग काय? राक्षसमंडळीत आनदीआनद झाला. मोहासुराचा राज्या-भिषेक, तत्कृतत्रैलोक्यविजय देवांचा वनवास, दैत्यांचा उन्माद, सत्क-र्मांचा लोप इत्यादि गोष्टी पद्धतशीर रीतीने झाल्या मोहासुराला उग्र, क्रूर, मेधावी, शोचन व हरण असे पांच वीर्यशाली पुत्र झाले त्यास कैलास, वैकुंठ, सौरलोक, शक्तिलोक व सत्यलोक येथील राज्ये देऊन मोहासुर आपल्याकडे पृथ्वीचे राज्य ठेविता झाला. तथापि देव जिवंत होते ह्मणून त्याच्या चित्ताला चैन नव्हती. तेव्हा देवांस मारण्याचे जे मुख्य साधन, त्याचा त्याने आश्रय केला. ते साधन ह्मणजे सत्कर्माचा विध्वंस होय. हा होऊं लागला तेव्हां देवांस

तळमळ लागली पण सकाळचा आत्मा व बुद्धिदाता जो सूर्य, त्याने देवांस सांगितले की, 'निर्गुण्य जो परमेश्वर गणपति, त्याला शरण जाऊं. तोच आमच्या दुःखाचा परिहार करील.' मग देवांनी शुद्धचित्ताने गणनाथाची तपश्चर्या केली, गणेश प्रकट झाले तेव्हां त्यांची स्तुति केली आणि ही सर्व ब्रह्मांडे ज्या जगजेठीच्या उदरी सांठविली आहेत, त्या महोदरागशी अखंड भक्तिचा वर मागितला. 'मोहासुराचा वध करून ज्ञानप्रसार होईल व देवमानवाचे वास्तव्य अखंड ज्ञानामध्ये राहील, असे करा' असाही एक वर मागितला. देवांची याप्रमाणे तयारी चालली आहे तो नारदांनी देवांची बातमी दैत्यास दिली! नारदाने मोहासुराला त्याच्या शक्तिचे व्यर्थत्व, गणेशाचे स्वरुप व ब्रह्मप्राप्ति करून घेण्याचे साधन सांगून आपण अन्यत्र गेला. पण मोहासुराला उपरति झाल्याच्या आधी तो गेला नाही. मोहासुराचा निश्चय झाला की, गणेशभक्ति करावयाची. तो त्याप्रमाणे गणेशभक्ति करू लागला. त्याचा मोह नष्ट होऊं लागला. धर्मरक्षणतत्पर जो महोदर त्याने (गणपतीने) विष्णूला शिष्टाईकरता मोहासुराकडे पाठविले. तेव्हां मोहाने विष्णूचा उत्तम सत्कार केला. विष्णूनेही पुनः मोहासुराला महोदराचे स्वरुप कथन केले व 'ब्रह्माशी समझोता कर' असा उपदेश केला. मोहाला तो उपदेश मानवला, पण इतर दैत्यांस मानवला नाही ह्मणून ते पाताळांत गेले. इकडे मोहासुर हा आपल्या पुत्रपौत्रांसह गणेशास शरण गेला व भावपुरःसर त्याचें स्तुतिस्तोत्र गाता झाला. महोदराने त्याला वर दिला की, 'माझ्या भक्तांस तूं मद्भक्तीचे प्रेम दे व यज्ञकर्मादि करून माझे स्मरण व पूजन जे करीत नाहीत, त्यांस विषयांचा मोह घाल. हा तुझा धर्म आहे. याप्रमाणे चालशील तर तुझे कल्याण होईल.' हा वर देऊन महोदर जाणार तो देवांनी त्याचे भजनस्तवनादिकांनी

पूजन केले व महोदर ' वर मागा ' असे ह्मणत असतांही ' मोहासुर ' शांत झाला, व धर्मसंस्थापना झाली. आता आह्मास तुझ्या अखंड भक्तिशिवाय काही नको ' असे विनयपूर्वक प्रार्थिले; वर देऊन महोदर अंतर्धान पावले; व शांत झालेला मोहासुर, संतुष्ट झालेले देव व सत्कार्यप्रचोदित ऋषी स्वस्वस्थानांप्रत आनंदाने निघून गेले.

## नरनारायण–विष्णुसंवाद–मायाकालगति–युगधर्म– कलियुग वर्णन–आश्रमधर्म

**सूत**:-गणेशभक्तांनो ! सूर्य वालखिल्य ऋषींस आणखी कथा सांगत आहे, ती ऐका: मृकंडऋषींला मार्कंडेय नावाचा एक तेजस्वी मुलगा होता. मुंज झाल्यावर पुष्कळ वर्षे ब्रह्मचारी राहून त्याने गायत्री-पुरश्चरण केले. ते पाहून शंकर प्रसन्न होऊन भक्तिमुक्तिचे व ' दीर्घायुषी हो ' असे वर देता झाला. मार्कंडेयही शंकरभक्ति कायम ठेऊन तपश्चर्या करीत राहिला. त्याच्या आश्रमांत एक दिवस नरनारायण आले. हे नरनारायण ह्मणजे सूर्यपुत्र जो धर्म त्याने विष्णुभक्ति केली म्हणून विष्णूच धर्माच्या उदरी नरनारायणरूपाने अवतीर्ण झाला. यांत नर म्हणजे जीव व नारायण म्हणजे शिव होत. यांची जोडी हेंच वैष्णव ब्रम्ह आहे. यांनी वडिलांची आज्ञा घेऊन श्रेष्ठप्रतिची तपश्चर्या केली व विष्णूस प्रसन्न करून घेतले. प्रकट होऊन विष्णूने त्यांस गाणपत्य योगाचे रहस्य व मार्ग सांगितला. त्यांनीही एकनिष्ठ भक्ति करून गणपतीचा साक्षात्कार होईल अशी तपश्चर्या केली व देवापाशी अखंड भक्ति व शांति मागितली व मिळविली. नंतर ते कांही

दिवसांनी मार्कंडेयावर अनुग्रह करण्याचे इच्छेने त्याच्या आश्रमीं गेले व तत्कृत पूजेचा स्वीकार करून रघुकुलतिलक जो रामचंद्र त्याला ज्ञान कसे झाले, तो वृत्तांत सांगते झाले.

हा सांगण्याचे अगोदर त्यांनीं दुसऱ्या कांहीं स्मरणीय गोष्टी सांगितल्या. त्या अशा: ब्रम्ह्याचा पुत्र मरीचि, त्याचा कश्यप, त्याचा सूर्य, त्याचा वैवस्वतमनु, असा हा वंश आहे. हल्ली सातवा मनु आहे. ब्रम्हदेवाच्या एका दिवसांत म्हणजे चतुर्युगांच्या हजार चौकड्यांत, चौदा मनु होतात. प्रत्येक मन्वंतरांत मनु, देव, ऋषी, इंद्र व विष्णु, यांचे अवतार निरनिराळे होतात. प्रत्येक मन्वंतरांत ऋषींनी मुख्य तत्वे ध्यानांत ठेऊन व प्रत्यही नवीन ज्ञान संपादून मनुष्यांस ज्ञानाचा व कर्माचा उपदेश करावा, यज्ञयागादि कर्में करावी व करवावी; वृष्टि वगैरे करून कर्मानुसार सर्वांचे परिपालन इंद्राने करावे; देवांनी आप-आपले हविर्भाग ग्रहण करून कर्मकर्त्यास आदरपूर्वक स्वर्भोग द्यावे; विष्णूने अवतार घेऊन दैत्यांपासून इंद्रादि देवांचे रक्षण करावे; मनु–पुत्र–पौत्रांनी राजधर्म स्वीकारुन प्रजेचे पालन करावे; असा कार्यभाग नेमलेला आहे. एक मन्वंतर झाले म्हणजे लय होतो ब्रम्हदेवाचा एक दिवस झाला म्हणजे नैमित्तिक लय होतो व ब्रम्हदेवाची शंभर वर्षे भरली म्हणजे महाप्रलय होतो. याप्रमाणे त्रिगुणात्मक जे आहे ते जन्ममृत्युमय म्हणजे नाशवंत आहे. हीच माया होय. निमेष, काष्ठा ( १५ निमेष ), कला, मुहूर्त, दिवस, पक्ष, मास, ऋतु, अयन, संवत्सर, पंचसंवत्सर ( १ ) संवत्सर, ( २ ) परिवत्सर, (३) इडावत्सर

( ४ ) अनुवत्सर व ( ५ ) वत्सर, अशी पांच वर्षांची निराळी नांवे आहेत. सूर्यमास व चंद्रमास असे दोन प्रकारचे महिने आहेत. सक्रांतीने सूर्यमास व पौर्णिमेने किंवा अमावास्येने चांद्रमास मोजतात. मनुष्यांची ३३०० वर्षे म्हणजे एक सप्तर्षिसंवत्सर होतो व ९९०० वर्षे म्हणजे ध्रुवसंवत्सर होतो. तसेच देवांची ४००० वर्षे म्हणजे कृत, ३००० वर्षे म्हणजे त्रेता, २००० म्हणजे द्वापार आणि १००० वर्षे म्हणजे कलियुग अशी १०००० वर्षे व संधिकालाची २००० वर्षे मिळून १२००० वर्षे म्हणजे एक चौकडी होते. मुनिहो ! कृत युगांत ध्यान, त्रेतांत तप द्वापारांत पूजा व कलींत स्तुति ( भजन ) मुख्य असतात. कृतांत धर्म चतुष्पाद, त्रेतांत त्रिपाद, द्वापारांत द्विपाद व कलींत एक पाद असतो. कृतयुगांत ज्ञान, त्रेतांत सूर्य, द्वापारांत विष्णु व कलींत शंभु ही मुख्य दैवतें आहेत. चारी युगांत सर्वदेवाधीश गणपति आहे. कृतयुगांत त्याला ‘ विनायक ’ त्रेतांत ‘ मयुरेश, ’ द्वापारांत ‘ गजानन ’ व कलींत ‘ गणेश ’ म्हणतात. कृत युगांत आयुष्य १ लक्ष, त्रेतांत १० हजार, द्वापारांत १ हजार व कलींत शंभर वर्षे आहे. कृत युगांत प्रजा स्वधर्मनिष्ठ परोपकाररत, मत्सरशून्य व सदासुखी असते. त्रेतायुगांत परोपकार कमी, स्वार्थ जास्ती व लोभ मनस्वी असतो, द्वापारात स्वार्थप्रधान, कलहप्रिय, प्रजा होते. लोक बाहेरुन साधु पण आंतून कपटी असतात. कलि तर साक्षात् पापमूर्तीच आहे. या युगात स्वधर्म व परोपकार नष्ट होऊन कलह, मत्सर इत्यादि पूर्णत्वास जातात. सर्व प्रकारचे लोक दुष्टाचाररत होतात.

सूत :- मुनीहो ! दया, तप, शौच, आणि सत्य हे धर्माचे चार पाय आहेत. त्रेतायुगांत दया, द्वापारात दया व तप आणि कलियुगांत दया, तप आणि शौच लोपतात. कलियुगाच्या शेवटी गणेश 'ढुंढी' रूपाने अवतरून अधर्माचा नाश करतात व पुनः कृतयुगास सुरुवात होते. मुनिहो ! तुम्हांस ठाऊक आहे की, ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण व ब्रह्मचर्य, गृहस्थता, वानप्रस्थ व संन्यास असे चार आश्रम आहेत, क्षत्रिय व वैश्य यांस संन्यास नाही, शूद्रांना केवळ गृहस्थाश्रम आहे. ब्राह्मण मुलाची ५ वे किंवा ७ वे वर्षी मुंज करून त्यास वेदादिविद्याध्ययनासाठी गुरुगृही पाठवावे. तेथे त्याने दोन वेळ भिक्षा मागावी, गायत्रीजप करावा, त्रिकाल संध्या करावी, ॐकारयुक्त त्रिपदा गायत्रीचा जप न्यासपूर्वक करावा, भिक्षा गुरुस निवेदन करावी, ता देईल तेवढीच घ्यावी, दोन्ही वेळ अग्निसिद्ध करावा, गुरुगृहांतील जनांची सेवा करावी, श्मश्रु करु नये, स्त्रीसंगति ठेऊ नये, गुरु शिकवितील त्याचे अध्ययन करावे; याप्रमाणे विद्या संपूर्ण होईपर्यंत ब्रह्मचर्य धरुन वेदादिक कंठगत करावे, नंतर गुरुची पूजा करून व त्यास दक्षिणा देऊन विषयवासना असतील तर संसार करावा. व विषयी मन नसेल तर ब्रह्मचारी राहावे वा संन्यास घ्यावा. हा ब्रह्मचर्यविधी. याने उत्तम ज्ञानप्राप्ति होते गृहस्थाश्रम घेणाऱ्याने क्षौर करून घरी यावे व आईबाप, द्विज व देव यांच्या सेवेत तत्पर असावे. नंतर योग्य वधू पाहून लग्न करावे. ऋतुकाली मात्र भार्यासंगति असावी. यजन–याजन, दान–प्रतिग्रह, अध्ययन–अध्यापन हा षट्‌कर्मांचे नित्य आचरण करावे. स्नान, संध्या, जप, होम, देवपितृमुनितर्पण, अतिथिसेवा, देवतार्चन, स्वाध्याय, वैश्वदेव ही गृहस्थाची नित्यकर्मे आहेत दोन्ही चतुर्थ्या करून मग काय व्रते करणे असतील ती

करावी. नित्य शुचिर्भूत असावे. जे मिळेल त्यातील अर्धाभाग स्त्रीपुत्रांकडे, चतुर्थांश भाग मित्राकडे व दुसरा चतुर्थांश देवादिकांकडे उपयोजावा. आयुष्याच्या तिसऱ्या भागांत ह्मणजे पन्नाशी उलटल्यावर पुत्रकलत्रांस विचारून क्षेत्रवास किंवा वनवास पत्करावा. कंदमुळादिकांनी अग्निहोत्र, अतिथि, देव यांचे पूजन करुन शेष उरेल ते आपण भक्षावे. कोणतेही गृहस्थी भोगूं नयेत. जमल्यास पंचाग्निसाधन, जलवास, आकाशवास ऋतुमानाप्रमाणे करावा. हा वानप्रस्थाश्रमधर्म होय. शेवटच्या प्रहरांत ह्मणजे पाउणशे वर्षे झाल्यावर सर्वसंगपरित्याग करून संन्यास घ्यावा, ब्रह्मचिंतन करावे नित्य नव्या ठिकाणी वास करावा. करतलभिक्षा घ्यावी. सैन्यास त्रिदंडी ( स्वधर्माचरण हा देहदंड. मौन हा वाग्दंड आणि आशाहीन मन हा मनोदंड होय. ) किंवा कुटीचक ( घरीच संन्यासव्रताने असणे ) असावा. सदैव 'मी ब्रह्म आहे' अशी भावना असावी. 'मला अमुक कर्तव्य करून अमुक मिळवायचे आहे' अशी भावना नसावी; अथवा योगयुक्त असावे. लोकसंग्रह करावा. हा संन्यासाचा धर्म आहे. ब्राह्मणाचा धर्म ज्ञानसंग्रह करून त्याचा प्रसार करावा, यजन–याजन करावे हा आहे. त्याने अन्न उत्पन्न करणारा कोणताही धंदा करूं नये व भिक्षा मागू नये. क्षत्रियांनी सेवा करूं नये व संन्यास घेऊं नये. अग्निहोत्रादि विप्रांकडून करवावे. त्यांनी अध्ययन व यजन करावे व दान द्यावे वैश्यांनी क्रयविक्रय, कृषिकर्म व गोपालन करावे, अध्ययन, यजन व दान ही यांस विहित आहेत. अग्निकर्म, देवतार्चन, तर्पण हे त्यांनी ब्राह्मणद्वारा करावे, शूद्रांनी सेवा करावी, दान द्यावे, पुराणश्रवण करावे, वेद ऐकूं नयेत, नाममंत्राने पूजादिकर्मे करावी, पुराणोक्त मंत्रांनी श्राद्धादिकर्मे करावी सात वर्षांच्या आत मुलीचे लग्न करूं नये व दहा वर्षांच्या पुढे लग्न ढकलूं नये. पति

हे स्त्रीचे मुख्य दैवत आहे. त्याची तिने एकनिष्ठ सेवा करावी. तो वानप्रस्थ झाला व आपल्यास लहान मुलेबाळे नसली तर पतीबरोबर वनांत जावे. तो संन्यास घेऊं लागला तर तिने त्यास अनुमति द्यावी ऋतुगामी तिनेही असावे. पति मेल्यावर एकभुक्त असावे; व्रतेवैकल्ये करून देह शोषवावा आणि ईश्वरचिंतन करावे. सर्वांनी श्राद्धपक्ष भक्तिने करावे. अमावास्या, व्यतिपात, वैधृतीला श्राद्ध इष्ट आहे. क्षेत्राचे ठिकाणी व मयुरपुरी श्राद्ध अवश्य करावे.

## अंगरीष–मुचकुंद

सूत :- मुनिगणहो ! मनूला दहा पुत्र झाले. पण त्यात ज्येष्ठ जो सुद्युम्न तो गौरीवनांत गेल्यामुळे कन्या झाला. ! कारण त्या वनात जो कोणी शिरेल तो स्त्री होईल, असा शंकराने या वनाला शाप दिला होता. ही सुद्युम्ना ह्मणजे 'इला' यौवनभराने शोभू लागली. ती तेथे असता तिला चंद्रपुत्र बुध भेटला. दोघांचे मन जुळून त्यास पुरूरवा नावाचा पुत्र झाला. हा चंद्रवंशाचा मुळपुरुष होय. हा महापितृभक्त ह्मणून याच्या नावाचा श्राद्धांत उच्चार होतो. असो; पुढे सुद्युम्नाने तपद्वारा विनायक प्रसन्न करून पुनः पुरुषत्व प्राप्त करून घेतले. नंतर त्यास उत्कल, गय व विमित असे तीन पुत्र झाले. वृद्धपणी त्यांच्या हातात राज्यकारभार देउन सुद्युम्न वनात गेला व गणेशभक्ति करून स्वानंदवासी झाला. सुद्युम्नाची इला झाली तेव्हा मनूने इक्ष्वाकूला राज्याभिषेक केला. त्याने सूर्याची तपश्चर्या केली, म्हणून याला सूर्यवंशाचा मूळपुरुष म्हणतात. गणेशवराने इक्ष्वाकूला 'विकुक्षि' झाला. त्याला राज्यभार देऊन इक्ष्वाकु

गणेशयोगाने स्वानंदवासी झाला. त्याचा पुत्र ककुत्स्थ हाही गणेशभक्त होता. नंतर पुत्रपौत्रपरंपरेने मांधाता उत्पन्न झाला. ह्याचे इंद्राने रक्षण केले होते. हाही महागणेशभक्त होता. ह्याचा नातु अंबरीष हा विष्णुभक्त व एकादशीव्रत चालविणारा होता. निर्जळी एकादशी करून द्वादशीला सूर्य उगवला नाही, तो हा पारणें सोडी. एकदा दुर्वासाने याचे सत्त्व पाहिले, ते असे:– एका द्वादशीस त्याला पारणे सोडण्यास बोलाविले, पण तो वेळेवर आला नाही म्हणून विष्णूतीर्थ मात्र घेऊन अंबरीषाने पारणे सोडले हे दुर्वासाला कळल्यावर त्याने राजाला शाप दिला व न जेवता तसाच गेला. राजा त्याची वाट पाहत तसाच उपाशी राहिला. एक वर्षभर त्याने उपवास केले. एक वर्षानंतर नारद तेथे आले व त्यांनी राजाला गणेशयोगाचा मार्ग सांगितला व षडक्षरी मंत्र देऊन त्याला तपश्चर्येला सिद्ध केले. त्याने उत्तम तपश्चर्या केली. तदनंतर दुर्वासऋषि आले व त्यांनी अंबरीषाची क्षमा मागून त्याबरोबर भोजन केले व त्यास व्रतमुक्त केले. अतिथीस बोलाविले असता तो आला नाही तर यजमानाने तो येईपर्यंत उपाशी राहावे हा नियम, हे व्रत, आहे. असो; पुढे अंबरीष गणेशपूजन करून मुक्त झाला. त्याचा मुलगा मुचकुंद होय. याने देवांचा पराभव करणाऱ्या दैत्यांशीं पुष्कळ वर्षे युद्ध करून त्यांचा पराभव केला. पण मुचकुंद या युद्धांत थकला होता त्याला विश्रांति हवी होती, म्हणून देवापाशी विश्रांति व ज्ञान त्याने मागितले. त्यांनी विश्रांतीसाठी मुचकुंदाला एक गुहा दिली व तेथे स्वस्थ नीज असे सांगितले. 'तुला जो जागा करील तो मरेल व तूं तेथे जागा होशिल तेंव्हा तुला वासुदेवरूपाने विष्णूचे दर्शन होईल व तो वासुदेव तुला ज्ञान देईल.' असा देवांनी वर दिला

व हा गंधमादन पर्वताच्या गुहेंत निजला. इकडे कृष्णावतारी कृष्णाने कंसाला मारले, जरासंधाचा सतरावेळ पराभव केला; पण यादवांचा पराभव करणाऱ्या कालयवनाला जरासंधाने मदतीस बोलाविले, तेव्हां यादवांस द्वारकेकडे हटून जाण्यास सांगून आपण स्वतः श्रीकृष्ण कालयवनाच्या समोरून पळत गेला कालयवन पाठीस लागला. याप्रमाणे पुष्कळवेळ हुलकवणी झाली. नंतर कृष्ण गंधमादन-पर्वतावरील गुहेंत जाऊन लपला. कालयवनाने तो निजलेला मुचकुंद पाहून हाच कृष्ण असे मानले, व लाथा मारून त्यास उठविले. त्याने कालयवनाकडे पाहतांच तो दग्ध झाला पुढे कृष्णदर्शन होऊन मुचकुंदाला कृष्णाने गणेशयोग सांगितला व आपण मथुरेला परत जाऊन यवनांचा व जरासंधाचा पराभव केला. मुचकुंदाने आमरण गणेशाराधन केले व शेवटी उत्तम लोकाप्रत गेला.

या मुचकुंदाच्या वंशात सगर ह्मणून एक राजा झाला. त्याच्या बायकोचे नांव भानुमती होते. त्या दोघांनी मिळून भृगुनामक योग्याची अराधाना केली. भृगुमुनि प्रसन्न होऊन त्यांस वर देता झाला कीं, 'तुह्मांस साठहजार पुत्र होतील; पण एक पुत्र मात्र वंशधर होईल. त्या वंशधराचे नांव असमंजस असे ठेवा.' हा असमंजस मोठा झाल्यावर त्याने आपल्या सर्व भावांस शरयू नदींत टाकले ह्मणून बापाने त्यास राज्याबाहेर हाकलून दिले' ह्या टाकून दिलेल्या साठहजार मुलांस राजाने योगबलाने बाहेर काढले. नंतर कांहीं दिवसांनी सगराने एकामागून एक असे नव्याण्णव अश्वमेध केले हे पाहून इंद्राला भय पडले व त्याने शंभराव्या अश्वमेधाच्यावेळी यज्ञाचा घोडा चोरला व पाताळांत कपिलमुनि तपश्चर्या करीत होते. त्यांच्या जवळ तो नेऊन ठेवला. सगराचे पुत्रही

महापराक्रमी होते. घोड्याच्या पावलांवरून त्याचा माग काढण्याकरिता ते पाताळापर्यंत भूमि खणीत गेले. ह्या खणलेल्या जागेतच महासागर उत्पन्न झाले. असो; सगराचे मुलगे पाताळात गेले व तेथे त्यांनी आपला घोडा पाहिला. जवळ कपिलऋषि होते. ह्यांच चोर आहे असे समजून सगरपुत्रांनी कपिलास ठार मारण्याकरिता शस्त्रे उगारली. तो कपिलाच्या क्रोधाने ते सर्वच्यासर्व दग्ध झाले! नंतर नारदानी हे वर्तमान सगराचा नातू अंशुमान याला कळविले व 'पाताळांत जाऊन कपिलमुनीची स्तुतिपूर्वक पूजा कर म्हणजे ते संतुष्ट होऊन यज्ञाचा अश्व परत देतील.' असे सांगितले. अंशुमानाने तसेच वागून कपिलमुनीकडून अश्व परत आणला व आपल्या आजाच्या म्हणजे सगराच्या स्वाधीन केला. सगराने आनंदार्थ शंभरावा यज्ञ पूर्ण केला आणि नातवास राज्यावर बसवून आपण गणेशोपासनेसाठी अरण्यात गेला. त्याची अनन्य भक्ति पाहून श्रीगणपती प्रसन्न झाले व साक्षात्कार देऊन त्यास मुक्त केले. अंशुमान राजाही गणपतिभक्तच होता. त्याचा नातू राजा भगीरथ सद्धर्माने प्रजापालन करीत असता एकदा नारदमुनि तेथे आले व त्यानी कपिलक्रोधाने सगरपुत्र दग्ध झाले हा वृत्तांत सांगून भगीरथाला उपदेश केला की, 'स्वर्गातून गंगानदी खाली आणून तिच्या जलाने तुझ्या पूर्वजांची रक्षा भिजली तर मात्र त्यास उत्तम गति मिळेल. पितरांचा उद्धार करणे हे वंशजांचे कर्तव्य आहे, म्हणून ऊठ आणि गंगानदी आणण्याची खटपट कर.' भगीरथास तो उपदेश मान्य झाला. त्याने शंभर वर्षे तपश्चर्या केली व गंगानदी प्रसन्न होऊन तिने भगिरथपितरांचा उद्धार करण्याचे कबूल केले; पण ती म्हणाली 'मी ज्या वेगाने खाली येईन तो सहन करण्यास एक शंकर मात्र समर्थ आहे, तेंव्हा त्यास प्रसन्न करून घे.

भगीरथाची एकनिष्ठ तपश्चर्या पाहून शंकर प्रसन्न झाला झाला व आपल्या मस्तकावर ‘गंगानदीचा ओघ उतरुं दे’ असा वर भगीरथास देता झाला. ‘आपण सर्वश्रेष्ठ’ असा गंगानदीला गर्व झाला होता, तो शंकराच्या अनंत जटाभारातून आपल्यास बाहेर येण्याचे सामर्थ्य नाही असे पाहून नाहीसा झाला व शंकराने तिला भूमिलोकावर जाण्याची परवानगी दिली. भूमीवर उतरुन गंगानदी सगरपुत्रांकडे जावयास निघाली. वाटेत जन्हुराजा समाधि लावून बसला होता. तो वाट सोडीना ह्मणून त्याला बुडविण्यासाठी त्याच्या अंगावरून ती गेली. तो त्या राजर्षीने सर्व गंगानदी प्राशन करून टाकली! नंतर भगीरथाने पुनः तपश्चर्या करून जन्हूस प्रसन्न करून घेतले व गंगानदीस मुक्त करा अशी प्रार्थना केली. संतुष्ट झालेल्या जन्हूने आपली मांडी फोडून तिला बाहेर काढली. यास्तव गंगेला जान्हवी ह्मणतात असो, गंगानदीने दग्ध सगरपुत्रास स्नान घालून त्यांचा उद्धार केला. भगिरथाने गंगानदीला भूमि-लोकावर आणली ह्मणून तिला भागीरथी ह्मणतात. राजा भगीरथ गणेशभक्त होता. उत्तम प्रकारची भक्ति करून तो मोक्षपद मिळविता झाला. त्याच्या वंशात राजा दशरथ हा कश्यपांशाने जन्म पावला. त्याला कौसल्या, कैकेयी व सुमित्रा अशा तीन भार्या होत्या. पुष्कळ दिवसपर्यंत त्याला पुत्रप्राप्ती झाली नाही. हे पाहून वसिष्ठाने दशरथाला गणेशाचा दशाक्षरी मंत्र जपण्यास सांगितले. वायुभक्षण करून दशरथाने शंभर वर्षे गणेशमंत्राचे पुरश्चरण केले. गणपती प्रसन्न झाले व त्यांनी वर दिला की, ‘तुला अखंड भक्ति व उत्तम प्रकारची कीर्ती मिळविणारे चार पुत्र होतील.’ रावणवधाकरिता गणपतीनी विष्णूस आज्ञा केली की, ‘तुम्ही निरनिराळे चार देह

धारण करून दशरथांच्या उदरी या व राक्षसांचा नाश करून आणि सद्धर्मांची स्थापना करून देवास संतुष्ट करा.

**सूत** :– शौनकादिकहो ! तुम्हाला रामाचा जन्म, विश्वामित्राच्या यज्ञाचे रक्षण करून रामाने राक्षसांचा संहार केला, विश्वामित्रांनी रामास अस्त्रविद्या दिली, शंकराचे धनुष्य सज्ज करून रामाने जानकी मिळविली, कैकयीने दशरथापासून वर घेऊन रामाला चौदा वर्षे वनवासास धाडले, दंडकारण्यांत सीतेसह व लक्ष्मणासह रामचंद्र राहत असता, मायावी रावणाने जानकीचे हरण केले; शिवांनी उपदेश केल्यावर रामाने गणेशयोगद्वारा गणपतीस प्रसन्न करून घेतले, व त्याच्यापासून असे वर मिळविले कीं, 'ज्यायोगें गणेशाची अखंड भक्ति राहील, मनास शांति मिळेल; नित्य स्मरण असेल व गेलेली जानकी परत मिळेल;' नंतर सुग्रीवहनुमानादिकांशी सख्य करून रामाने लंकेवर स्वारी केली; गणपतिस्मरण करून रामाने रावणादिकांचा वध केला, देवांची सुटका करून, बिभीषणास लंकेचे राज्य देऊन व वेदोक्तधर्माची स्थापना करून रामचंद्र सीतेसह अयोद्धेस परत आला; आणि गणेशभक्तिकरून शांत मनानें निजधामास गेला; इत्यादि वृत्तांत तुम्हांस विदितच आहे. ऋषोहो ! मार्कंडेयऋषींच्या विनंतीवरून सूर्यानें, जन्ममरण देणारी, सुखदु:ख उत्पन्न करणारी व कामक्रोधादिकांस जन्म देणारी जी विलक्षण माया, तिचा प्रभाव मार्कंडेयास दाखविला आणि हेरंबमंत्राचें रहस्य सांगून गणपतिभजनपूजन करण्याकरिता त्याने मार्कंडेयास वनांत पाठवून दिले.

## पुरूरवस आख्यान–नहुष

**सूत** :– मुनीहो ! अत्रिऋषींचा मुलगा जो चंद्र त्याने गणपतीचे आराधन केले आणि त्याच्या कृपेने तारकांचे, ब्राह्मणांचें व औषधींचें

आधिपत्य मिळविले; पण कांहीं कालाने तो गणपतीचे भजनपूजन विसरला, त्याला मोह प्राप्त झाला आणि तो विषयसेवनामध्ये निमग्न झाला. एकदां बृहस्पतीची भार्या तारा तीर्थावर स्नान करण्यास एकटीच आली आहे असे पाहून, ती नको नको असे ओरडत असतां, चंद्राने तिला हट्टाने नेले. चंद्रापासून तिला गर्भ राहिला. अशा स्थितींतही बृहस्पतीने आपली बायको परत मागितली. चंद्र तिला परत देईना. तिला घेऊन तो राक्षसगुरु जो शुक्र, यांच्याकडे गेला. राक्षसांनी चंद्राला आश्रय दिला. हे पाहून शंकरप्रमुख देवांनी राक्षसांच्या राज्यावर स्वारी केली. देव दैत्यांचे युद्ध जुंपले व ते अहोरात्र महिनाभर चालू राहिले. देवांचा व दैत्यांचा पुष्कळच संहार होत आहे हे पाहून बृहस्पतीला पश्चाताप झाला. ‘ आपण गणपतीस विसरलो, त्यायोगाने विघ्नें उत्पन्न होऊन बंधुविरोध झाला, देवदैत्यांचा नाश होत आहे, देवा ! आता पुढे काय होणार. मी तुला अनन्यभावाने शरण आलो, कृपा कर आणि या विघ्नांचा नाश कर,’ अशी त्याने गणपतीची प्रार्थना केली. चंद्रालाही पश्चात्ताप झाला आणि त्याने गणपतीपाशी तेच मागणे मागितले. दयाळू गणपतीनी तेथे ब्रह्मदेवास पाठविले. ब्रह्मदेवाने बृहस्पतीची बायको तारा बृहस्पतीस दिली. तारेच्या उदरीं जो गर्भ होता त्याने सांगितले की माझा जन्म चंद्रापासून आहे ! त्यावरून तो गर्भ ब्रह्मदेवाने चंद्राच्या स्वाधीन केला. त्याच गर्भाचे नांव बुध हे होय. त्यालाच सौम्य असेही म्हणतात. ह्याच बुधाचा मुलगा पुरूरवा होता. त्याच्या जन्माची कथा मी तुम्हांस सांगितलीच आहे. हा राजा धर्मनीतीने पृथ्वीचे राज्य करीत होता. एकदा असे झाले कीं त्याच्या बागेंत उर्वशी नामक एक

अप्सरा हिंडत होती, तिला पाहून राजा मोहित झाला व माझी धर्मपत्नी हो' असे त्याने तिला विनंती केली. तीं म्हणाली 'हे माझे दोन मेंढे आहेत, ह्यांचें उत्तम रक्षण करीन व दिगंबर स्थितींत तुला कधीही दिसणार नाही' असे वचन देत असशील तर घृत मात्र भक्षण करून मी तुझ्या येथे राहीन.' राजाने ते सर्व कबूल केले आणि मुनिशापाने मृत्युलोकी आलेल्या उर्वशीस राजवाड्यांत नेले त्यांचा लग्नसमारंभ मोठ्या थाटाचा झाला. त्यांस आयु आदिकरून सहा मुलगे झाले. ह्याप्रमाणें ती उभयतां सुखाने नांदत होती पण इकडे स्वर्गलोकीं इंद्रास उर्वशीवांचून चैन पडेना; तेंव्हा त्याने विश्वावसुप्रमुख गंधर्व तिला आणण्यासाठी पाठविले. कपट करून त्यांनी ते उर्वशीचे दोन मेंढे उचलले व उर्वशीला जागी करून ते मेंढे घेऊन चालते झाले उर्वशी ओरडली व राजास उठवून त्याला मेंढ्याचे संरक्षण करण्यास सांगितले. लगबगीने दिगंबर राजा उठून धनुष्यबाण घेण्यास तातडीने निघाला, तो नीलाकांशांत विजेचा लख्ख प्रकाश पडून राजाची दिगंबर स्थिति उर्वशीने पाहिली. तिला राग आला आणि लागलीच ती गंधर्वांच्या पाठीमागे स्वर्गास निघून गेली. पाठीमागे हाय हाय करीत राजा धरणीवर मूर्छित पडला. काही वेळाने सावध झाला, पण त्यास अत्यंत शोक झाल्यामुळे तो भ्रमिष्ट झाला व उर्वशी!' 'उर्वशी!' असे दीनवाणींने ओरडत रानावनात हिंडू लागला. एक वर्षभर हा राजा वेड्यासारखा हिंडत होता. वर्षाच्या अखेरीस उर्वशी त्याच्या दृष्टीस पडली. तिचे त्याने आर्जव केले. व मागच्यासारखो चुकी पुन्हा करणार नाही; असे हात जोडून सांगितले. उर्वशी म्हणाली, मी गंधर्वांच्या स्वाधीन आहे, ह्मणून पितृयज्ञ करून तूं त्यांस संतुष्ट कर, ह्मणजे त्यांच्या कृपेने

तुला स्वर्गांत राहता येईल आणि तुझी माझी संगति घडेल एवढ्यानेही राजाचे समाधान होईना, तेव्हा प्रतिवर्षी एक दिवस मी येथे येत जाईन असे तिने वचन दिले. राजाने पितृयज्ञ करून पितृगणास संतुष्ट केले. त्यांनी पुरुरव राजास वर दिले की, ‘ उर्वशी अप्सरा तुला मिळेल आणि श्राद्धकाळी सर्व देवास ‘ पुरुरवसंज्ञक असे आव्हान केले असता मात्र ते श्राद्धभोजनास येतील. ’ याप्रमाणे वरप्राप्ति करून घेऊन राजा सुखाने राज्य करू लागला, आणि निधन पावल्यावर स्वर्गलोकी उर्वशीच्या समागमाचा त्यास लाभ झाला. पुढे विषयभोगांचा कंटाळा येईल असा नारदाने त्यास उपदेश केला, व राजाच्या विनंतीवरून त्याला गणेशयोगाची दीक्षा दिली. राजाने पुष्कळ वर्षे एकनिष्ठ गणेशोपासना केल्यावर गणपति प्रसन्न झाले आणि त्यास मुक्त करून स्वानंदवासी केले. या राजाचा नातू नहुश राजा होय. याने सर्वत्र अजिंक्यपत्रे घेऊन शंभर यज्ञ केले. इंद्र रागावला; पण धर्मनिष्ठ राजाला इंद्राच्या हातून कोणताही उपद्रव होऊं शकेना. पण याच वेळी अहल्येला भ्रष्ट करणाऱ्या इंद्राला गौतमाने ‘ सर्व भ्रष्ट होशील ’ असा शाप दिला होता. तो योग प्राप्त होऊन स्वर्गांतील देवांस ‘ राजा नाही ’ असे झाले, राक्षसांनी स्वर्गावर स्वारी केली. अर्थातच देव व देवर्षी घाबरले. तेव्हा बृहस्पतीने त्यास मंत्र सांगितला की, ‘ तुह्मी राजा नहुष यास इंद्र करा, तो तुमचे संकट निवारण करील. ’ याप्रमाणे राजा नहुषला इंद्रपद मिळाले. हे असह्य वैभव नहुष राजाला गर्वयुक्त करते झाले. तो भोगरत झाला. इंद्राची भार्या शची आपल्यास असावी असे त्यास वाटू लागले. गणेशभक्ति उत्तम केल्यामुळे इंद्राची शापमुक्त होण्याची वेळ येऊन पोंचली होती. इकडे बृहस्पतीने राजा नहुषास

सांगितले की, 'शचीची मर्जी सुप्रसन्न करण्याकरिता तूं आपल्या पालखीस ब्राह्मण भोई लावून तिच्याकडे जा ह्मणजे ती तुझी मनकामना पूर्ण करील. नहुषाने पालखी वाहण्यासाठी ब्राह्मण बोलावून आणले त्यात दुर्वास होता. असो; पालखी लौकर लौकर चालविण्यासाठी उतावळा राजा 'सर्पध्वं ( लौकर चला )' असा वारंवार ओरडत होता. ते ऐकून दुर्वास ऋषि प्रकुप्त झाला. आणि 'सर्पो भव' ( तू सर्प होशील )' असा त्याने शाप दिला. हा शाप ऐकल्याबरोबर राजाचा गर्व गेला आणि त्याने दुर्वास ऋषींच्या पाया पडून 'मला उःशाप द्या' अशी करूण स्वराने याचना केली दुर्वासासही दया आली. ते ह्मणाले 'तुझ्या वंशात युधिष्ठिर या नावाचा एक धर्ममूर्ति राजा होईल. त्याचे दर्शन तुला झाले, व त्याने तुला ज्ञानाचा उपदेश केला, ह्मणजे तुझी सर्पयोनि सुटेल व तू मुक्त होशील. राजा ! वेदधारण करणाऱ्या लोकांचा छळ झाला असता धर्म लोप होतो हे ध्यानात ठेव; ' असे ह्मणून दुर्वास निघून गेले. व राजा सर्प होऊन खाली पडला.

तथापि त्याची पूर्वपुण्याई मोठी होती म्हणून गणेशभजन पूजनाची बुद्धि त्यास झाली. त्याने गणेशउपासना केली. पुष्कळ वर्षांनीं पंडुपुत्र भीमसेन; हा सर्प रहात होता तेथे गेला, तेव्हां त्याने भीमास जखडून टाकले. त्याला सोडविण्यासाठी राजा युधिष्ठिर येथे धांवत आला. तेव्हां 'धर्मराजा ! नहुष, मी तुझा पूर्वज आहे; मला ज्ञान देऊन तूं माझा उद्धार कर,' 'बरे आहे' असे युधिष्ठिराने नमस्कारपूर्वक उत्तर दिले. नंतर नहुषाने सत्य म्हणजे काय इत्यादि प्रश्न विचारले, त्यांस धर्माने उत्तरें दिली. ती अशीः–'सत्य म्हणजे ब्रह्म; हे जगमायामय आहे, स्वधर्म हा उत्तम धर्म होय, स्वधर्मलोप हे

महापातक आहे, मी व माझें ' हें बंधन आहे, ही बंधनें नसणें हाच मोक्ष होय, चित्ताचा निरोध करणें हा योग आहे. निर्विषय मन असणें ह्याला ध्यान ह्मणावे, सत्कर्म हेच कर्म, ब्रह्माला अर्पण केलेलें कर्म बद्धक होत नाही, पापाचरणाला विकर्म म्हणतात; ' मीं ब्रह्म आहे ' ह्याला ज्ञान म्हणावे, शीतोष्ण, सुखदुःख, भयाभय, हीं द्वंद्वें जेथें समरुपाची झाली, तेथेच तपाचा मूर्तिमंत अवतार आहे असे पंडित म्हणतात, गणेश हे मुख्य दैवत होय, देवाचें भजन हे सार, आणि विषयांचे भजन हे असार होय; वेदसंमत ते मान्य, वेदविहीन ते अमान्य म्हणावे. आपल्या बुद्धीमध्ये राहून बुद्धीला चालना देणारा तो सर्वेश्वर होय ' ही उत्तरे ऐकून नहुषाचे समाधान झाले. इतक्यांत स्वर्गीहून नहुषाला घेऊन जाण्यास एक विमान आले आणि गणेशभजन करीत राजा स्वर्गास जाऊन अनंत सुख भोगता झाला.

## ययातिचरित्रें

**सूत** म्हणतो :-मुनिहो ! नहुष कथेनंतर मुद्गलांनी ययाति राजाची कथा दक्षास सांगितली. ती अशीः– एकदा शुक्राची मुलगी देवयानी व राजा वृषपर्वा याची मुलगी शर्मिष्ठा, ह्या दोघीजणी क्रीडा करून स्नानासाठी पाण्यामध्ये उतरल्या. स्नान आटोपून शर्मिष्ठा प्रथम बाहेर आली आणि गडबडीने देवयानीचे वस्त्र नेसली. हे पाहून देवयानीने शर्मिष्ठेची पुष्कळ निर्भत्सना केली. शर्मिष्ठेनेही उत्तरास प्रत्युत्तर दिले व सखींच्या साहाय्याने देवयानीला विहिरींत ढकलून दिले. दैवयोगानें त्याच वेळी मृगया करून थकलेला राजा ययाति तेथे आला. देवयानी विहिरींत बुडत आहे असे पाहून कृपाळू राजाने तिचा हात धरून

तिला बाहेर काढले. नंतर, त्याचें सुंदर स्वरुप व उदार स्वभाव पाहून 'आपण मला हात धरून बाहेर काढली; व माझें पाणिग्रहण केले, म्हणून आपण माझें पाणिग्रहण करावे' अशी, तो ययातिराजा आहे असें समजल्यानंतर देवयानीने त्याची प्रार्थना केली. ययातीनेही तिच्या म्हणण्यास मान दिला; देवयानीला कोणीही ब्राह्मण वरणार नाही असा शाप होता. असो; बापाचे संमती घेण्याकरिता देवयानी ययातीस विचारून घरी गेली. घरी तिने आपल्या बापाजवळ सर्व हकीकत सांगितली. शुक्राने मुलीला लग्नाची परवानगी दिली, पण झालेला प्रकार ऐकून शुक्राला वाईट वाटलें. आणि 'माझी तुला गरज असेल तर शर्मिष्ठेला दासी करुन देवयानीबरोबर ययातीच्या घरी पाठव. जरुर नसेल तर मी निघून चालता होतो!' असे शुक्राने राजास दरडावून सांगितलें. राजासही ते मान्य करावेच लागलें. ह्याप्रमाणें शर्मिष्ठा देवयानीची दासी झाली व ययातीच्या घरो राहूं लागली. पुढे देवयानीला नकळत शर्मिष्ठेचा व ययातीचा गुप्तविवाह होऊन त्यापासून तिला अति सुंदर असे तीन पुत्र झाले. देवयानीला हा वृत्तांत कळल्यावर रागावून ही माहेरीं गेली. तिचे दुःख पाहून शुक्रमुनीने 'राजा वृद्ध होईल' असा ययातीला शाप दिला. ययाति वृद्ध झाला! पण विषयभोगाची इच्छा तृप्त झाली नव्हती म्हणून त्यास अतिशय वाईट वाटले. नतर तो पश्चात्तापयुक्त होऊन शुक्राकडे गेला, आणि 'देवयानी-शिवाय अन्य स्त्रीशीं मी संबंध ठेवणार नाही' अशी करुण स्वराने त्याने शपथ घेतली. नंतर शुक्राने राजास सांगितले की, 'तुझ्या मुलांपैकीं कोणी तुझें वार्धक्य घेऊन आपले तारुण्य तुला देण्यास कबूल असेल तर तू पुन्हा तरुण होशील.' तारुण्य-

प्राप्तीसाठी देवयानीस घेऊन राजा स्वनगरीस गेला व आपल्या मुलांजवळ तारुण्य मागू लागला. शर्मिष्ठेचा मुलगा पुरु याने मात्र बापाचे ह्मणणे कबूल केले. नंतर अनेक प्रकारचे भोग भोगून व पुष्कळ यज्ञ करून तो राजा ययाति स्वर्गांस जाता झाला. जाताना पुरूला सार्वभौमत्व देऊन, ययाती पुत्राच्या ऋणांतून मुक्त झाला. स्वर्गांस गेल्यावर ययातीने उत्तम प्रकारचे भोग भोगले. पण तेथे त्याला 'मी सर्व श्रेष्ट आहे' असा गर्व झाला, तेव्हा इंद्राने त्यास स्वर्गांतून खाली ढकलून दिले; पण शिबी इत्यादि त्याच्या मुलीचे मुलगे होते. त्यांनी आपले पुण्य ययातीस दिले व तो पुन्हा स्वर्गांस गेला तेथे नारदाचा उपदेश घेऊन त्याने गणेशभक्ति केली; आणि अंती गणेशलोकांस गेला.

## कृतवीर्य चरित्र–सहस्त्रार्जुन व परशुराम

सूत :- पुरुराजाच्या वंशात कृतवीर्यनामक एक राजा झाला, त्याची कथा सांगतो ऐका : पूर्वी माहिष्मती नगरीमध्ये भीम या नावाचा पापी व द्रव्यलोभी अंत्यज रहात असे. तो वाटमाऱ्याचा धंदा करी व पशूंचे मांस विक्रित असे. एकदा माघ महिन्याची कृष्ण-चतुर्थी प्राप्त झाली. त्या दिवशी तो पुष्कळ हिंडला, पुष्कळ पर्वत व अरण्ये त्याने पालथी घातली, पण त्याला खाण्याचा किंवा पिण्याचा एकही पदार्थ मिळाला नाही. सहजच त्याला उपवास घडला. सूर्य-अस्त झाला तेंव्हा त्याने घरी जाण्याची तयारी केली व परत फिरला. वाटेत त्याला बारा ब्राह्मण भेटले त्यास ठार मारून व त्यांचे जवळ काय होते नव्हते, तेवढे लुबाडून तो चंद्रोदयी घरी परत आला. चंद्रोदयानतर भोजन करताना त्याने आपल्या गणेश नावाच्या मुलास हाक मारली ! पुन्हा आणखी एका चतुर्थीचे वेळी त्याने तसेच पाप केले; पण त्या

चंद्रोदयाच्या वेळी तो मरण पावला. तेव्हा त्याला नेण्याकरता गणेशदूत विमान घेऊन आले. स्वर्गलोकी पुष्कळसे भोग भोगून तो मृत्युलोकी ययातीच्या वंशात कृतवीर्य या नावाने पुन्हा जन्मास आला. हा मोठा धार्मिक राजा होता. याने पुष्कळ दिवस उत्तम प्रकारचे राज्य करुन प्रजेस पुष्कळ सुख दिले. पण संतान नव्हते ह्मणून राजा स्वतः अति दुःखी होता. पुढे प्रधानादिकावर राज्यभार सोपवून राजा कृतवर्मा स्त्रीसह अरण्यांत तपश्चर्या करण्याकरिता गेला. त्याने पुष्कळ दिवस उग्र तपश्चर्या केली; ती इतकी कीं, त्याचे शरीरावर केवळ अस्थि व चर्म मात्र शिल्लक राहिले. सर्वांस वाटले कीं, राजदंपत्याचा अंत लौकर होणार त्याचा बाप धनक हा स्वर्गामध्ये होता. ब्रह्मदेवाकडे जाऊन 'माझ्या मुलास पुत्रप्राप्ति लवकर कशी होईल याचा उपाय सांगा.' अशी त्याने विनंति केली. त्यावर ब्रह्मदेव म्हणाला, 'सर्व संकटांचा व सर्व पापांचा नाश करणारी जी संकष्टी–चतुर्थी तिचे उपवासपूर्वक व्रत तुझ्या मुलाने केले, व चतुर्थीच्या दिवशी पुण्याचरणच, जर केले तर तुझ्या मुलाचे मनोरथ पूर्ण होतील. तुझ्या मुलाने पूर्वजन्मी चतुर्थीच्या दिवशीच बारा ब्राह्मणांचा वध केला आहे ते पाप तुझ्या पुत्रास नडत आहे या पापाचा नाश केवळ चतुर्थी व्रताने मात्र होईल.' हें ऐकून धनकाने चतुर्थी व्रताचा उपदेश कृतवीर्याला स्वप्नामध्ये जाऊन केला. निर्जळ उपवास, गणेश व चंद्र यांस अर्घ्यप्रदान, चतुर्थीच्या दिवशीं सर्व दिवसभर गणेशस्मरण, चंद्रोदयीं पूजनपूर्वक ब्राह्मण–दंपत्य–भोजन हे मुख्य विधि होत. चतुर्थीचे रात्रीं गणेशकीर्तनही करावे. याप्रमाणें राजाने सर्व विधि पाळून गणपतीचे हे उत्तम व्रत निर्दोषरीतीने पाळले याप्रमाणे एक

वर्षभर व्रतपालन केल्यावर राजाचे सर्व पूर्वपाप नाहीसे झाले. नंतर त्याला एक पुत्र झाला. पण दुर्दैवाने तो पुत्र हस्तपाद शून्य होता. पण राजाला दत्ताने धीर दिला होता, म्हणून त्याने मोठा पुत्रोत्सव केला. बारा वर्षे लोटल्यावर दत्त योगी तेथे आला आणि त्या मुलास हस्तपदादि अवयव येतील म्हणून सांगितले पुढे कृतवीर्याने गणेशभक्ति उत्तम प्रकारची केली आणि तो गणेशलोकास गेला. कार्तवीर्यानेही एकनिष्ठ गणेशभजनपूजन केले, तेव्हा तो पूर्णांग झाला व त्याला सहस्त्र भुज प्राप्त झाले. तो महाबली, महावीर्यवान् आणि महातेजस्वी झाला.

सूतः- मुनिहो ! कार्तवीर्याने, पुष्कळ दिवस धर्माने व नीतीने राज्य केले व पृथ्वीवरील सर्व राजांचा पराभव करून सार्वभौमत्व संपादन केले सहस्त्रार्जुन हे नाव त्याला देवांनींच दिले होते. त्याचे सैन्य प्रचंड व तो स्वतः शूर होता म्हणून त्याचा देवादिकांस सुद्धां धाक वाटे. एक दिवस हा स्त्रीसहवर्तमान स्नान करण्याकरिता नर्मदेच्या कांठी गेला तेथे स्नान करीत असता सहज आपल्या हजार बाहूंनी नर्मदेच्या जलाचा ओघ त्याने लीलेने थांबवून धरला. इकडे रावण आपल्या भावांसह शंकराची पूजा करीत नर्मदेच्या वरच्या अंगास बसला होता तेथपर्यंत नर्मदेचे पाणी आले ! हा नर्मदचा ओघ कोणी अडविला हे पाहून रावण आपल्या भावांसह व सहा प्रधानांस बरोबर घेऊन कार्तवीर्याला मारण्याकरिता क्रोधाने धावला. उभयतांचे मोठे गदायुद्ध झाले. कार्तवीर्याने रावणाचे कवच फोडले, त्याला खाली पाडले घरी नेले आणि दहा तोंडांचे बाहुले म्हणून दिवाणखाण्यात खेळणे करून ठेवले ! काही दिवसांनी रावणास त्याच्या आजोबांनी सोडविले. असो; कार्तवीर्याने पुष्कळ यज्ञ केले.

भिक्षुक जी दक्षणा मागतील ती त्यास दिली. प्रजेस स्वधर्माने चालावयास लावले, आपण गणेशभक्ति केली, आणि इहलोकांचे सर्व सुख भोगले. पण दुर्दैवाने काही काळ गेल्यावर त्याला गर्व-मोहांचा विकार झाला. त्याचे गणेशभजन सुटले आणि तो पापकर्म करण्यास प्रवृत्त झाला. पुढे एके दिवशी, मृगया करीत करीत राजा जमदग्नीच्या आश्रमात सहज गेला. जमदग्नि व सहस्रार्जुन या उभयतांनी एकमेकांचे कुशल विचारले, स्तुति केली आणि पूजा केली. मुनीच्या आग्रहावरून राजा सहस्रार्जुन आपल्या सैन्यासह भोजनास राहिला. जमदग्नीनें रेणुकेला म्हणजे आपल्या स्त्रीला कामधेनूची प्रार्थना करून सर्व सैन्यास पुरेल असें चारी प्रकारचे उत्तम अन्न उत्पन्न करण्यास सांगितलें. कामधेनूच्या कृपेनें सर्वांचें समाधान होईल असें सुग्रास अन्न, उत्तम फळें, सुवासिक तांबूल इत्यादि सर्वांस मिळालें. जमदग्नीनें राजास पाठवणीचीं वस्त्रेंही दिलीं. हा सर्व प्रकार पाहून राजास अतिचमत्कार वाटला आणि 'मला ही कामधेनु द्या' अशी त्यानें जमदग्नीस विनति केली. पण मुनि कामधेनु देईना. हें असें पाहून राजानें हट्टानें ती गाय नेण्याचा प्रयत्न केला. तेव्हां गाईच्या अंगापासून अनेक प्रकारचे वीर उत्पन्न झाले व लीलेनें त्यांनीं राजसैन्याचा पराभव केला. राजा पळून गेला व कामधेनु स्वर्गास निघून गेली. पुढें पुनः परत येऊन राजानें जमदग्नीस ठार मारलें व रेणुकेस एकवीस बाण मारून तिला विव्हल केलें. रेणुका रागावली आणि तिनें राजास शाप दिला कीं, 'तुझें हजार बाहू नाहींसे होऊन तू लवकरच मरशील.' हें ऐकून दुःखी झालेला राजा परत

फिरला. इकडे रेणुका पतीसाठी शोक करूं लागली. कांही वेळानें परशुरामाचें स्मरण तिनें केलें. परशुराम तेथें आनंदानें आला, पण मातापितरांची ती अवस्था पाहून त्याचें हृदय फुटलें व तो ओक्साबोक्शीं रडूं लागला. तेंव्हां आईने त्यास सांगितलें, 'तूं आह्मां दोघांची उत्तरक्रिया कर, कार्तवीर्याचे हात तोड, त्याला मारून टाक, त्याचें रक्त आपल्या वडिलांस समर्पण कर, म्हणजे त्यांचें समाधान होईल; आणि त्यानें मला एकवीस बाण मारले आहेत म्हणून एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी कर म्हणजे माझें समाधान होईल.' असें म्हणून ती स्वर्गास गेली. परशुरामानेंही आईनें सांगितल्याप्रमाणें उत्तरक्रिया केली. रेणुका व जमदग्नि ह्यांनीं स्वर्गलोकीं श्रीगणेशाचें उत्तम आराधन केलें व त्यास प्रसन्न करून घेतलें. गणपतींनीं 'तूं सदा शांत राहशील' असा जमदग्नीस आशीर्वाद दिला, व 'रेणुके! तुला सर्व देव, देहयुक्त पाहतील' असा वर दिला व त्यांस पुन्हा मृत्युलोकीं सदेह पाठविलें. तीं उभयतां आश्रमांत आल्यावर परशुरानें वडिलांस सांगितले कीं, 'मी आतां, आईस वचन दिल्याप्रमाणे, कार्तवीर्याचा व क्षत्रियांचा नाश करण्यास जातो.' हिंसा करू नको' असा जमदग्नीने पुष्कळ उपदेश केला, पण परशुराम आपला आग्रह सोडीना; तेव्हां त्यास गणेशमंत्राची दीक्षा देऊन तपश्चर्या करण्यासाठी वनांत पाठविले. परशुरामाने एकनिष्ठ तपश्चर्या करून गणपतीस प्रसन्न करून घेतलें. गणपतींनी वर दिला कीं 'तूं कार्तवीर्यास मारशील, एकवीस वेळा निःक्षत्रिय पृथ्वी करशील आणि

तुझा सर्वदा जय होईल.' हे वर देऊन गणपतींनीं आपला परशु जामदग्न्य रामास दिला. तो घेऊन रामाने कार्तवीर्याचे हात तोडले; त्याला ठार मारले; एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली आणि आपल्या पूर्वजांस क्षत्रियांच्या रक्ताने तृप्त केले. पुढें रामानें अनेक यज्ञ करून सर्व पृथ्वी ब्राह्मणांस देऊन टाकली आणि समुद्राजवळून जमीन मागून घेऊन आपण तेथें राहिला. 'दक्षा!' मुद्गलऋषि सांगतात, 'अद्यापिही परशुराम तेथें गणपतींचें भजनपूजन करीत राहिला आहे!'

**सूतः**– ह्याच कार्तवीर्याच्या कुळांत भोजांचा व वृष्णींचा जन्म झाला. यादवकुळांत उग्रसेन, देवक, वसुदेव, इत्यादि मोठमोठाले पुरुष झाले. वसुदेवाच्या पत्नीचें नांव देवकी होय. ह्यांच्याच उदरीं श्रीजगद्गुरु वासुदेव अवतीर्ण झाला. हा विष्णूचा अवतार भूमीचा भार हरण करण्याकरितां व साधूंचे पालन करण्याकरितां विष्णूनें घेतला होता. वसुदेव आणि रोहिणी यांच्या उदरीं बलरामाचा जन्म झाला. असो!

**सूतः**–एकदां देवांनीं राक्षसांचा पराभव केल्यावर राक्षस पळून गेले. असें असतांही देवांनी पुन्हां त्यांच्यावर स्वारी केली. देव आलेसे पाहून राक्षस शुक्रपत्नीला शरण गेले. तिनें 'भिऊं नका' असा त्यांस धीर दिला. देव तेथें आले आणि भृगुपत्नी राक्षसांस आपल्याकडे ढकलून देत नाहीं असें पाहून विष्णूनें भृगुपत्नीस ठार केले. शुक्र घरी आले व आपली पत्नी विष्णूने

मारली असे पाहून त्यास संताप आला आणि त्या भरात त्यानी विष्णूला शाप दिला की, 'तुला भूमिलोकांत मनुष्ययोनीमध्ये जन्म प्राप्त होईल आणि तुझे ज्ञान नष्ट होईल.' हा शाप ऐकून विष्णूला अति दुःख झाले. तो अरण्यात गेला व तेथे मनःसंयमन करून गणपतीची त्याने एक वर्षभर अत्युत्कृष्ट तपश्चर्या केली; गणपतीस प्रसन्न करून घेतले, आणि त्याच्यापासून वर संपादन केला की, 'आपले ज्ञान एका वेळेस मात्र नष्ट होईल.' गणपतीनी विष्णूस सांगितले की, मृत्युभूमीवर तूं अवतार घेतल्यानंतर तुला देवकार्य करतां येईल, तुला अतिशय कीर्ती प्राप्त होईल, लोक तुझी भक्ति करतील आणि शेवटी तुला शांति प्राप्त होऊन माझ्या लोकाला येशील.

सूत :– नंतर, मुद्गलांनी पुरुवंशाचा विस्तार थोडक्यात सांगून, शंतनूला गंगेच्या उदरी सर्व शास्त्रवेत्ता भीष्म झाला; व सत्यवतीच्या पोटी दोन पुत्र झाले व ते लौकर मेले ही हकीकत सांगितली. पुढे पंडु, धृतराष्ट्र व विदुर यांची उत्पत्ति सांगितली. मुनीहो! विदुर हा यमाचा अंश, पण एका शूद्रीच्या पोटी अवतीर्ण झाला. कारण असे झाले : यमाला मांडव्य ऋषीचा शाप होता, त्याची कथा ऐकः–

## मांडव्यचरित्र

मांडव्य ऋषि एका आश्रमामध्ये तपश्चर्या करीत बसले होते; तेथे कांही चोरांनी नगरांतून लुटून आणलेले द्रव्य टाकले व आपण राजदूतांच्या भयाने पळून गेले. ऋषीजवळ चोरलेले द्रव्य पाहून राजदूत संतप्त झाले, मुनीला त्यांनी पकडले आणि सभोवतालच्या लोकांचे कांहीएक न ऐकता मौन धारण केलेल्या मुनीस मारीत

मारीत स्वनगराला घेऊन गेले. चोरीची ही हकीकत समजल्यावर राजाही संतप्त झाला व मागचा पुढचा विचार न करतां ' ह्या मुनिवेश-धारी चोरास सुळावर चढवा ' असा त्याने हुकूम केला. सुळावर असतांनाच मांडव्याने आपल्या गुरुकडून गणेशदिक्षा घेऊन तदनुसार गणेशकवचाचा अनेकवेळा जप केला. त्यायोगाने मुनीला कोणत्याही प्रकारची इजा झाली नाही. सुळावर असूनही मांडव्य ऋषि आनंदात आहे, असे पाहून राजाला चमत्कार वाटला. तो लागलीच मुनीजवळ जाऊन ' मी आपला विनाकारण छळ केला ' असे ह्मणून रडूं लागला. ' माझ्या प्राक्तनाचा भोग आहे, तुजकडे कांही दोष नाही ' असे सांगून मुनीने राजाचे सांत्वन केले. राजाने ऋषिला सुळावरून खाली उतरवले, पण मुनीच्या हातात सुळाचे एक टोक शिरले होते ते कांही केल्याने निघेना. पुढे, तसाच तो मुनि आपला दुखरा हात घेऊन यमधर्मांकडे गेला व क्रूर वाणींने ' मला एवढी घोर शिक्षा कशाबद्दल दिली ते सांग, नाहीतर तुला शाप देऊन भस्म करून टाकतो. ' असे मुनीने त्याला दरडावून सांगितले. यम ह्मणाला ' आपण लहान असता एका किड्याला काटा टोचून दुःख दिले. होते, त्याचे प्रायश्चित्त ह्मणजे हे शूलगत दुःख आहे. ' मांडव्य ह्मणाला ' यमा, एवढ्या मोठ्या स्थानावर तूं असून, तुला नीति अनीति कांही समजत नाही. माझा तुला असा शाप आहे की, मृत्यु लोकांमध्ये शंभर वर्षे तुला शूद्र जातीत रहावे लागेल. ध्यानात ठेव की, आठ वर्षांच्या वयाच्या आंतील मुलांच्या हातून जी कांहीं अज्ञानाने पापे होतील त्याबद्दल त्यांना शिक्षा करावयाची नाही, असा आज मी नियम करून ठेवितो. हा नियम मोडशील तर खबरदार ' नंतर मांडव्य ऋषि आपल्या आश्रमास निघून गेला. पुढे गणपतीच्या

एकाक्षरी मंत्राचा एकनिष्ठ जप करून त्याने गणपतीस प्रसन्न करून घेतले. थोड्याच दिवसात त्याच्या हाताचे दुखणे थांबले; व तो गणेशयोगी अखंड शांति पावला.

## कृष्णयुधिष्ठिर संवाद–पूर्णानंदावतार–ब्रह्मयज्ञवर्णन–युधिष्ठिर चरित्र–

मुनींनो! शंतनुचा ज्येष्ठ नातु जो धृतराष्ट्र तो आंधळा होता ह्मणून ब्राह्मणांच्या अनुज्ञेने पंडू राज्य करू लागला, त्याने प्रजेचे पालन प्रशंसनीय पद्धतीने केले. त्याला परमेश्वरकृपेने धर्मभीमार्जुनादि पाच पुत्र देवाच्या अंशाने झाले. धृतराष्ट्रालाही दुर्योधनादि शंभर पुत्र व एक कन्या अशी अपत्ये झाली. ही चुलतभावंडे मोठी झाल्यावर द्वेषबुद्धीने परस्परांशी भांडू लागली. दुर्योधनाने तर पंडुपुत्रांचा अतिशय छळ केला, पण पांडवांचे भाग्यच मोठे ह्मणून ते जिवंत राहिले पुढे भीष्माच्या मध्यस्थीने पांडवास राज्याचा अर्धा वाटा मिळाला. पुढे कांही दिवसांनी भीमार्जुनाच्या पराक्रमाने पांडवांनी दिग्वीजय केला व यादवांचा व यदुनायक जो श्रीकृष्ण त्याचा स्नेह संपादन केला. दिग्वीजय झाल्यावर पांडवांनी जो अपूर्व राजसूययज्ञ केला आणि आपल्या पराक्रमाचे, यशाचे, वीर्यांचे व सामर्थ्यांचे जे अलौकिक प्रदर्शन केले ते सर्व पाहून दुर्योधनाला अत्यंत वाईट वाटले व मत्सर उत्पन्न झाला. त्यांचा नाश करण्याकरता द्यूत खेळण्याची युक्ति शकुनिमामाने काढली व पांडवास आपल्या नगरी बोलावून आणले, कपटद्युत खेळून त्यांच्या सर्व राज्यसंपत्तीचे हरण केले; ह्या द्यूतातील शेवटचा जो पण होता तो हरला तर पांडवास बारा वर्षे बनवास व एक वर्ष अज्ञातवास काढावा लागणार

होता. हा पण पांडव हरले, आणि त्यास वनवासास जावे लागले. वनवासात असतां कृष्णाने धर्मराजास गणेश उपासनेचे माहात्म्य सांगितले व वैकुंठवासी, विष्णु हा नित्य व अखंड गणेशभजन करीत असतो, ही गोष्ट धर्मराजास श्रुत केली. याचप्रमाणे गणपतीचे स्वरूप त्याची उपासना गणेशयोग आणि शेवटी मिळणारी अभंग शांति, यांचेही त्याने उत्तम वर्णन केले. आणखी सांगितले की, 'महालक्ष्मीने अत्यंत उग्र अशी तपश्चर्या करून गणपतीला प्रसन्न करून घेतले.' परमेश्वर प्रसन्न झाल्यावर त्यांनी लक्ष्मीस सांगितले की, 'तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. ज्ञानारि नामक असुराचा नाश करण्याकरिता, मी तुझ्या उदरी अवतार घेईन. तुला उत्तम प्रकारची शांति मिळेल, आणि तुझी कीर्ती अबाधित व सर्व काळ टिकेल. कृष्ण पुनः ह्मणतो. 'धर्मा! दुर्बुद्धि नामक दैत्याला शिवपुत्र जो विघ्नहर त्याने मारले, ही कथा तुला ठाऊकच आहे. त्याला ज्ञानारि नावाचा एक महापराक्रमी मुलगा होता. त्याला त्याच्या वृद्ध मंत्र्याने सांगितले कीं, 'तुझ्या बापास विघ्नहरानें ठार मारलें आहे.' म्हणून देवांचा सूड घेणें तुझे कर्तव्य आहे.' हें ऐकून ज्ञानारीला संताप आला व सूड उगवण्याचा त्यानें निश्चय केला. नंतर ज्ञानारी शुक्राश्रमी सर्व विद्या शिकला. त्यांतच त्यांनीं त्याला ( ज्ञानारीला ) शिवाच्या पचाक्षरी मंत्राची दीक्षा दिली. वायु भक्षण करून एक हजार वर्षेपर्यंत ह्या पंचाक्षरी मंत्राचा जप ज्ञानारीनें केला. शेवटी भोळा शंकर प्रसन्न झाला; आणि 'चराचरापासून तुला कोणतीही भीती नाहीं. तुझ्या सव इच्छा परिपूर्ण होतील आणि तुझी प्रकृति सदैव निरोगी राहील' असे वर दिले. ही वरप्राप्ति झाल्यावर शुक्रानें केलेला राज्याभिषेक, ज्ञानारीनें युद्ध करून मिळवलेलें सप्तद्वीपा पृथ्वीचें स्वामित्व, देवपराजय,

स्वर्गप्राप्ति, सत्यलोक, वैकुंठलोक व कैलासलोक येथें ज्ञानारीनें मिळ-विलेलें विजय, ब्रह्मविष्णुशंकरांचे पलायन इत्यादि गोष्टी एकामागून एक सहज होत गेल्या. ह्या अलौकिक पराक्रमानें ज्ञानारीची सत्ता सर्व त्रैलोक्यभर पसरली. पण ह्या सत्तेचा परिणाम कर्मविनाश होण्या-मध्यें झाला. स्वाहा, स्वधा व षट्कार इत्यादि शब्द सुद्धां ऐकू येईनासे झाले. अशी पुष्कळ वर्षे लोटल्यावर व देवब्राह्मणांना अति ताप झाल्या-वर विष्णुप्रमुख देव विघ्नहर्त्या गणपतीला शरण गेले ; व त्या दयाळू जगदीश्वरापासून जगतास सुखकारक असे वर मागून घेतले. पुढे लौकरच गणपतींनीं वैकुंठलोकीं लक्ष्मीच्या उदरीं अवतार घेतला. विष्णुलक्ष्मींनीं व भक्तजनांनी ह्या वेळीं अनेक प्रकारचीं गणपतिस्तोत्रें गाईलीं. जातकर्मादि मौंजीबंधनापर्यंतचे सर्व संस्कार झाल्यावर गणप-तीचें लग्न झाले. लक्ष्मीनें गणपतीची मोठ्या आनंदाने उत्तम सेवा केली.

इकडे ज्ञानारीला सुबोध नांवाचा एक मुलगा झाला. तो अखंड विघ्नेशचिंतन करणारा महा गणपतिभक्त होता. त्याचे लहानपणचे खेळ सुद्धां गणपतीच्या उपासनापर असत. ही सुबोधाची गणेशभक्ति एकदां ज्ञानारीचे दृष्टीस पडली, तेव्हा तो अतिशय रागावला आणि भार्येस सांगता झाला की, 'पुन्हां ह्या कार्ट्यांचे असले हे भिकार ढंग माझ्या दृष्टीस पडले तर मी याला ठार मारून टाकीन!' हें ऐकून सुबोधची आई सावध झाली. तिला सुबोधची वृत्ति समजली होती. तेव्हा आपले बालक पतीच्या दृष्टीस पडणार नाही, अशी त्या माऊली-नें व्यवस्था केली. पाचव्या वर्षी सुबोधाची मुंज झाली- नंतर विद्याभ्यासासाठी सुबोध गुरुगृही गेला; पण तेथेही तो गणपतीचे भजन व गणपतीचे पूजन एक क्षणभरही विसरला नाही. गुरुगृही गेल्यावर सुबोधाने तेथील ब्राह्मणास गणपतीच्या स्वरुपाचे उत्तम

वर्णन करून सांगितले. ते ऐकून श्रोत्यास ह्या बाळाचे मोठे कौतुक वाटले प्रल्हादाने विचारल्यावरून ह्या बाळाने त्यास नैमिषारण्यामध्ये एक मोठा ब्रह्मयज्ञ झाला होता. त्याची गोष्ट सांगितली. हा ब्रह्मयज्ञ सिद्धीस नेण्यासाठी मरीचीकश्यपादि सर्व ऋषि, विष्णुशंकरादि सर्व देव, नाग. गंधर्व, चारण, सिद्ध, वसु, अप्सरा, सर्व देवी आणि सर्व कर्मनिष्ठ तपोनिष्ठ व ज्ञाननिष्ठ ब्राह्मण आले होते. ह्या अलौकिक सभेत 'सर्वांत कोणता देव मोठा !' ह्याविषयी मोठा कडाक्याचा वाद झाला, पण निकाल होईना. तेव्हा प्रत्यक्ष वेदांचेच स्मरण करून ते आल्यावर तद्वारा या प्रश्नाचा निकाल करावा, अशी विष्णूने युक्ति काढली, स्मरण करिताच वेद तेथे प्रत्यक्ष प्रगट झाले. त्यांनी उपनिषदांच्या आधारे ब्रह्मस्वरुपाचे वर्णन उत्तम प्रकाराचे केले. ह्या वर्णनाचा इत्यर्थ इतकाच होता की, श्रीगणेशभक्ति केली असता संसारमोक्षाचा व शांतिप्राप्तीचा प्रसार सुलभ होतो. हे रहस्य ऋग्वेदादि चारी वेदांनी व ओंकाराच्या प्रत्यक्ष मूर्तिमंत स्वरुपाने निरनिराळ्या पद्धतीनी प्रकट केले आहे. हे रहस्य ऐकून देवादि सर्वांसच आनंद झाला. त्यांनी वेदांची व ओंकाराची पूजा केली. ह्याप्रमाणे हा ब्रह्मयज्ञ आटोपल्यावर जमलेल्यांपैकी प्रत्येकजण गणेशभक्ति करावयास लागला. सुबोधाचे हे बोलणे ऐकून त्याच्या गुरुजींस फार आनंद झाला, पण ते ज्ञानारीस भित होते; म्हणून त्यांनी सुबोधास सांगितले की, 'तुझा बाप गणपतीचा व्देष करतो, म्हणून तूं त्याचे भजन टाकून दे.' हे ऐकून सुबोधाला वाईट वाटले आणि त्याने त्यास सांगितले की, 'काय वाटेल ते होवो, मी गणेशभजनाची माझी पद्धति सोडणार नाही.' पुढे लौकरच ज्ञानारीला हा वृत्तांत समजला आणि त्याने सुबोधास बोलावून आणून 'तूं गणपतीची भक्ति करूं नको, केलीस

तर तुला ठार मारीन ' असे दरडावून सांगितले. मुलगा ऐकेना. तेंव्हा 'सुबोधाला ठार मारा ' अशी आपल्या सेवकास ज्ञानारीने आज्ञा केली. त्यांनी अनेक शस्त्रांनी, पुष्कळ अस्त्रांनी, पर्वतावरून ढकलून देऊन, हत्तीच्या पायाखाली घालून, अग्नीमध्ये भाजून, समुद्रांत बुडवून, विष पाजून, त्याचा नाश करण्याचा प्रयत्न केला; पण सुबोधावर श्रीगणपतीचा उत्कृष्ट अनुग्रह होता, म्हणून त्याच्या जीवाला काहीएक धक्का लागला नाही. शेवटी ज्ञानारि रागाने वेडा होऊन गेला; व सुबोधाला मारण्याला स्वतः उद्युक्त झाला, तेंव्हांही सुबोधाने पित्याला बोध करावयास कमी केले नाही. मुलगा जितका शांत, तितका बाप रागावून वेडा झालेला होता. त्याने मुलाला हाती धरून ओढला आणि 'दाखव तुझा कोठे संरक्षण करणारा गणपति देव आहे तो. मला तो दिसेल तर मी त्याची भक्ति करनरी, न दिसेल तर तुला येथेच ठार मारीन ' असे ओरडला. भक्ताचे हे सकट पाहून वैकुंठात अवतार घेतलेले श्रीगणपति तेथे एकदम प्रकट झाले. सुबोधाने त्यांचे स्वागतपूर्वक पूजन करून बापास सांगितले की, 'हा माझा देव पहा ' ज्ञानारि क्रोधयुक्तच होता. त्याने गणपतीवर हात टाकला, तेव्हा गणपतीने काय केले ते ऐका. त्याचा देह सुटल्याशिवाय ज्ञानारीला शांति मिळणार नाही, असे जाणून युद्ध न करताच त्याचा जीवभावच त्यांनी हरण केला. त्यांचे प्रेत एकदम जमिनीवर खाली पडले.

दैत्यांचा आधार नाहीसा झाला व ते पाताळातून पळून गेले. परमेश्वरचरित्र अवलोकन करण्याकरता जे देवमुनि जमले होते, त्यांनी गणपतीची नाना प्रकाराने स्तुति केली. तेव्हा देव प्रसन्न

झाले, व सुबोधास व देवांस वर देऊन ते गुप्त झाले. ही कथा सांगून कृष्णाने धर्मास गणेशदीक्षा दिली. ती घेऊन पांडवांनी एकनिष्ठ भावाने गणेशपूजा केली. तिचे फळ हे झाले की, सूर्याने त्यांस थाळी दिली म्हणून त्यास अतिशय मोठे अन्न संतर्पण करता आले, पुढे वनवास व अज्ञातवास आटोपल्यावर कौरव-पांडव युद्ध झाले, युद्धात गणेशकृपेने पांडवांचा जय झाला व गणेशभक्तीने त्यास अखंड शक्ति मिळाली व शेवटी ते स्वानंदवासी झाले.

या दिवसापासून दक्षिणेमध्ये जे महोदराचे क्षेत्र आहे त्याचा महिमा अतिशय वाढला.

[ तृतीय खंड समाप्त ]